राज्यातील कृषी व यंत्रमाग ग्राहक यांना वीज दरात सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य (समायोजन) सन २०१८-२०१९.

**महाराष्ट्र शासन**
**ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.निधिवी-२०१८/प्र.क.४५/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : १४ नोव्हेंबर, २०१८

**संदर्भ** :- १) शासन परिपत्रक वित विभाग अर्थसं-२०१८/प्रक्र.६९/अर्थ-३ दि.०२.०४.२०१८
२) शासन निर्णय ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. निधिवी-२०१८/ प्र.क.४५ /ऊर्जा-३, दिनांक २४.०५.२०१८

**प्रस्तावना** :-

राज्यातील विविध वर्गातील ग्राहकांना शासनाच्या धोरणानुसार वीज दरात सवलत देण्यात येते. याकरिता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी यांना वित्तीय वर्ष २०१८-१९ मध्ये मागणी क्रमांक के-६ मुख्य लेखाशिर्ष २८०१२६१५ या लेखाशीर्षाखाली एकूण रु.४९४१.४१ कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. अर्थसंकल्पित तरतूदीपैकी संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये रुपये ११५४.०३ कोटी रोखीने वितरीत करण्यात आली आहे. उर्वरित तरतूदीपैकी रू.१५९५.७६ कोटी इतकी रक्कम महावितरण कंपनीस रोखीने न देता महावितरण कंपनीकडून शासनास येणे असलेल्या विद्युत शुल्क व वीज विक्री करापोटी समायोजित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

कृषी ग्राहक व यंत्रमाग ग्राहक यांना सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना देय असलेली अर्थसहायाची रक्कम रु.१५९५.७६कोटी (रुपये एक हजार पाचशे पंच्याणव कोटी श्याहत्तर लाख फक्त) पुस्तकी समायोजनाने वितरीत करण्यास या निर्णयाद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. वरील बाबींचा खर्च “मागणीक्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, ८०० इतर खर्च, (००) (०१) कृषी विषयक व यंत्रमाग विषयक प्रशुल्क कमी करण्यासाठी वीज वितरण / पारेषण अनुज्ञप्तीधारकांना अर्थसहाय्य (२८०१२६१५) ३३ अर्थसहाय्य” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. समायोजनाने वितरीत करावयाची रक्कम रु.१५९५,७६,००,०००/-(रुपये एक हजार पाचशे पंच्याणव कोटी श्याहत्तर लाख फक्त) महावितरण कंपनीस रोख न देता पुढे दर्शविल्याप्रमाणे महावितरण कंपनी मर्या., यांच्याकडून शासनास येणे असलेल्या रक्कमेपोटी वसूल करण्यात यावी व खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली पुस्तकी समायोजनाव्दारे जमा करण्यात यावी.

| अ. क्र. | तपशील | रक्कम रुपये | जमा लेखाशिर्ष |
|---|---|---|---|
| १) | वित्तीय वर्ष २०१७-१८ या वर्षातील विद्युत शुल्कापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम | १४९६,९७,००,०००/- | ००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्रीय यावरील कर (०१) (०१) मुंबई विद्युत शुल्क अधिनियम १९५८ खालील जमा रकमा (००४३००९२) |
| २) | वित्तीय वर्ष २०१७-१८ या वर्षातील वीजेच्या विक्रीवरील करापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम | ९८,७९,००,०००/- | ००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्री यावरील कर (०१) (०३) महाराष्ट्र विजेच्या विक्रीवरील कर (००४३००८३) (सुधारणा) अधिनियम २००४ |
| | एकूण | १५९५,७६,००,०००/- | |

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई यांनी त्यांच्या अखत्यारित व अधिकारात वरील विवरणपत्रानुसार सदर रक्कम रु.१५९५,७६,००,०००/-(रुपये एक हजार पाचशे पंच्याणव कोटी श्याहत्तर लाख फक्त)चे पुस्तकी समायोजन करुन तसे शासनास कळवावे.

६. सदर रक्कमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल, मुंबई यांच्या अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने रु.१५९५,७६,००,०००/-(रुपये एक हजार पाचशे पंच्याणव कोटी श्याहत्तर लाख फक्त) रकमेचे देयक तयार करण्यात येऊ नये.

७. महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०१८/परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ च्या परिशिष्टामधील अनुक्रमांक ७ व ८ मधील तपासणी सूची मधील अटींची तसेच परिच्छेद क्रमांक २ व १० मधील प्रत्येक अटीची पूर्तता झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

८. या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षीप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाण पत्र प्रलंबित नाही. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १५२/१४६१, दिनांक २४.०७.२०१८ तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १४९/१८/व्यय-१६, दिनांक १०.१०.२०१८ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१८१११४१२४६४३६७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nanasaheb Rajaram Dhane

Digitally signed by Nanasaheb Rajaram Dhane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, serialNumber=6c39e2858150dbdfcfe6cd25ed08adf59f4d2fd8c1ede1730735f604904bf3bb, cn=Nanasaheb Rajaram Dhane
Date: 2018.11.14 12:52:39 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१
२) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्यादित, हॉंगकॉंग बँक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई
३) सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं.१, १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा, मुंबई-०५
४) मा.विरोधी पक्ष नेता विधानसभा / विधानपरिषद महाराष्ट्र विधान मंडळ, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
६) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
८) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१, मुंबई.
९) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१०) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
११) कक्ष अधिकारी (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
१२) विशेष कार्य अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१३) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-३ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
१४) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, कर मार्ग रामकृष्ण चेंबूर, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.
१५) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.